केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियान (NLM-National Livestock Mission) अंतर्गत प्राप्त होणाऱ्या प्रकल्प प्रस्तावांची छाननी करण्यासाठी समित्यांचे गठन करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एनएलएम-२०२१/प्र.क्र.१५७ /पदुम-४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०००३२.**
**दिनांक : १० फेब्रुवारी, २०२२**

वाचा-: कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्रमांक: एनएलएम-२०२१/प्र.क्र. १५७/ पदुम-४, दि. २७.१२.२०२१

प्रस्तावना :-

वाचा येथील दि. २७.१२.२०२१ च्या शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ पासून केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियान ही योजना केंद्र शासनाच्या सुधारीत मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यात राबविण्यास प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेली आहे.

केंद्र शासनाने या योजनेंतर्गत विकसित केलेल्या ऑनलाईन पोर्टलवर राज्यातील शेतकरी/ पशुपालक / कुक्कुट व्यवसायिक यांच्याकडून मोठया प्रमाणात प्रकल्प प्रस्ताव सादर करण्यात येत आहेत. सदरच्या प्रकल्प प्रस्तावांची केंद्र शासनाने या योजनेच्या अनुषंगाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना तसेच, अटी व शर्तीची पूर्तता होते किंवा कसे या अनुषंगाने प्रथमत: जिल्हास्तरावर व तदनंतर पात्र प्रकल्प प्रस्तावांची पशुसंवर्धन आयुक्तालयाच्या स्तरावर सखोल छाननी होणे आवश्यक आहे. पशुसंवर्धन आयुक्तालयाच्या स्तरावर छाननी अंती पात्र ठरलेले प्रकल्प प्रस्ताव राज्यस्तरावर गठित करण्यात आलेल्या राज्यस्तरीय कार्यकारी समितीच्या बैठकीत सादर करणे अपेक्षित असल्याने जिल्हा व पशुसंवर्धन आयुक्तालयाच्या स्तरावर छाननी समिती गठित करण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०२१-२२ पासून केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत केंद्र शासनाने विकसित केलेल्या ऑनलाईन पोर्टलवर पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे यांच्याकडे प्राप्त होणाऱ्या प्रकल्प प्रस्तावांची या योजनेच्या अनुषंगाने केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना तसेच अटी व शर्तींचे पालन होते किंवा कसे याची तसेच, इतर मुद्यांच्या अनुषंगाने प्रस्तावांची सखोल छाननी करण्यासाठी खालीलप्रमाणे जिल्हास्तरावरील तसेच, पशुसंवर्धन आयुक्तालयाच्या स्तरावरील छाननी समिती गठीत करण्यास याव्दारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**(अ) जिल्हा स्तरावरील छाननी समिती:-**

| | |
|---|---|
| १. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त (संबंधित जिल्हा) | अध्यक्ष |
| २. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद (संबंधित जिल्हा) | सदस्य |
| ३. प्रकल्प प्रस्तावाशी संबंधित तज्ञ व्यक्ती (आवश्यकता भासल्यास) | सदस्य |
| ४. सहाय्यक आयुक्त पशुसंवर्धन, संबंधित जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त कार्यालय | सदस्य सचिव |

**(ब) पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे स्तरावरील छाननी समिती:-**

| | |
|---|---|
| १. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे | अध्यक्ष |
| २. अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे | सदस्य |
| ३.पशुसंवर्धन उपसंचालक (वैरण विकास), पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे | सदस्य |
| ४. उपायुक्त पशुसंवर्धन ( पशुधन व कुक्कुट), पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे | सदस्य सचिव |

**<u>जिल्हास्तरीय छाननी समितीची कार्ये :</u>**

१. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार प्रकल्प प्रस्तावाची छानणी करणे

२. प्रकल्प प्रस्तावासोबत आवश्यक सर्व कागदपत्रे उदा. आधारकार्ड, पॅनकार्ड, रहिवासी पुरावा, सविस्तर प्रकल्प अहवाल, जमिनीच्या मालकी हक्काचा पुरावा अथवा भाडेकरारनामा, प्रत्यक्ष जागेची छायाचित्रे, प्रकल्पांतर्गत स्वहिस्सा निधीबाबतचा पुरावा, मागील सहा महिन्यांचे बँक स्टेटमेंट, प्रशिक्षण व अनुभव प्रमाणपत्र आदी कागदपत्रांची पुर्तता होत असल्याची खात्री करणे.

३. प्रकल्प प्रस्तावामध्ये नमूद केल्यानुसार प्रत्यक्ष प्रस्तावित जागेची / जमिनीची पाहणी करुन खात्री करणे. सदर जागेवर अतिक्रमण नसल्याबाबतची खात्री करुन, वीज पुरवठा, पाणी पुरवठा, वाहतूक सुविधा इ. आवश्यक पायाभूत सुविधांच्या उपलब्धतेबाबतची खातरजमा करणे.

४. प्रकल्प प्रस्तावानुसार बँकेचे आवश्यक कर्ज उपलब्ध होऊ शकेल, याबाबत तपासणी करणे.

५. प्रस्तावित प्रकल्प हा जिल्ह्यातील हवामान, उपलब्ध पायाभूत सुविधा आणि विक्री व्यवस्थापन या दृष्टीने योग्य होईल, याबाबत समितीने त्यांचे अभिप्राय नमूद करावेत.

६. उपरोक्त नमूद १ ते ५ मुद्यांसंदर्भात अपूर्ण / त्रुटी असलेल्या प्रकल्प प्रस्तावाबाबत संबंधित व्यक्ती अथवा संस्थेस योग्य ते मार्गदर्शन करणे.

७. उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे तपासणी / छाननीअंती फक्त परिपूर्ण असलेले प्रस्ताव पुढील कार्यवाहीस्तव पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे संस्थेच्या स्तरावर गठित करण्यात आलेल्या छाननी समितीकडे प्रकल्प प्रस्ताव प्राप्त झाल्यापासून १५ दिवसांच्या कालावधीत सादर करणे.

**<u>राज्यस्तरीय छाननी समितीची कार्ये:</u>**

१. जिल्हास्तरीय छाननी समितीने सादर केलेल्या प्रस्तावांची प्रस्तावांची राज्यस्तरीय कार्यकारी समितीच्या शिफारशीने केंद्र शासनास मंजुरीकरीता शिफारस पूर्तता होत असल्याची खात्री करणे.

२. जिल्हास्तरीय समितीकडून प्राप्त झालेले परिपूर्ण प्रस्ताव राज्यस्तरीय कार्यकारी समितीकडे शिफरशीस्तव सादर करणे.

३. अपूर्ण प्रस्तावांबाबत त्रुटींच्या पूर्ततेकरिता संबंधित व्यक्ती / संस्थांना ऑनलाईन पद्धतीने परत पाठविणे.

४. जिल्हानिहाय प्राप्त प्रस्तावांचा नियमितपणे आढावा घेऊन, प्रस्तावांची शीघ्रतेने छाननी करणे.

५. बँक कर्ज मंजुरीबाबत आवश्यकतेनुसार बँकेशी समन्वय साधणे, बँकेला योजनेची / प्रकल्पाची माहिती देणे व बँक कर्ज मंजुरीबाबत संबंधित व्यक्ती / संस्था यांना सहकार्य करणे.

६.राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत पोर्टलवर ऑनलाईन पद्धतीने प्राप्त होणारे प्रकल्प प्रस्ताव जिल्हास्तरीय समितीला पाठविण्याकरिता केंद्र शासनास विनंती करुन जिल्हा कार्यालयांकरिता स्वतंत्र युजर आयडी व पासवर्ड प्राप्त करुन घेण्यात यावेत. केंद्र शासनाकडून स्वतंत्र युजर आयडी व पासवर्ड प्राप्त होत नसल्यास पशुसंवर्धन आयुक्तालयाच्या स्तरावर सदरचे प्रस्ताव डाऊनलोड करुन, ई-मेलद्वारे ते संबंधित जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त यांचे कार्यालयास पाठविण्यात यावेत.

७. केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय पशुधन अभियानांतर्गत केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, अटी व शर्तींची तसेच आवश्यक त्या सर्व कागदपत्रांची पूर्तता होत असलेले परिपूर्ण प्रस्ताव स्वयंस्पष्ट शिफारशीसह राज्यस्तरीय कार्यकारी समितीकडे सादर करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१११५२८१८७१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आलेला आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE

Digitally signed by DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=690002a7555559bb015f315b03adb3305c59fe381e4dcda1439d119129672733, pseudonym=B6831977DAFE9C462B1F5207DB8DC23334F34E62, serialNumber=5DBCE7AE3AC30F0E55C90CD14E851251037DC61F3291C80EA8638C44D41143AA, cn=DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
Date: 2022.02.11 15:33:46 +05'30'

**(डॉ.संजय वि. डोईजोडे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२) कुलगुरु, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर.

३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, नागपूर

५) व्यवस्थापकीय संचालक, पुण्यश्लोक अहिल्यादेवी महाराष्ट्र मेंढी व शेळी विकास महामंडळ, पुणे.

६) सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन.

७) प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा) - १/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर

८) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर

९) सर्व जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त.

१०) सर्व जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद.

११) अवर सचिव, पदुम-३, कक्ष अधिकारी पदुम १, २ व १६, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) निवड नस्ती-पदुम-४